महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई या महामंडळास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ३६-सहायक अनुदाने (वेतन) अंतर्गत अनुदान वितरीत करणेबाबत (अनिवार्य) (Unconditional)

महाराष्ट्र शासन
दिव्यांग कल्याण विभाग
शासन निर्णय क्रमांक : दिविम-२०२३/प्र.क्र.१६/दिव्यांग कल्याण-३
३१,३२,३५ ए, तिसरा मजला, ए-विंग, मित्तल टॉवर,
नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१.
दिनांक :- १६ जून, २०२३

वाचा:
१. वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि.१२.०१.२०२३.
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांचे दिनांक ०९.०५.२०२३ चे पत्र

प्रस्तावना:-

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ अन्वये च्या परिपत्रकानुसार दिव्यांग कल्याण विभागाच्या अधिनस्त कार्यरत असलेल्या महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई या महामंडळास मागणी क्र. झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली अनिवार्य योजनांर्गत ३६,सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता २० टक्क्यांच्या मर्यादेत निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियत्रण प्रणाली (BEAMS) वर वितरीत करण्यात आलेला आहे. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई यांनी उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये महामंडळाच्या अनिवार्य योजनांसाठी ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्यानुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या., मुंबई मार्फत राज्यातील दिव्यांगाना स्वयंरोजगारासाठी कर्ज स्वरुपात अर्थसहाय्य करण्यासंबंधी विविध कर्ज योजना राबविण्यात येतात. या महामंडळास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण (अनिवार्य) (२२३५D३६४) या लेखाशीर्षाखाली योजनांतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीकरीता अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २० टक्केच्या मर्यादेत एकुण रु.१९,१०,०००/- (अक्षरी रुपये एकोणीस लक्ष दहा हजार रुपये फक्त) एवढे अनुदान वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे. याबाबतचा सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे दर्शविण्यात आला आहे.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | अनिवार्य योजनेचे नाव | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२३-२४ करीता अर्थसंकल्पीय तरतूद | सन २०२३-२४ करीता विभागाकडून वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | मागणी क्र.झेडआय-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०८-दिव्यांग कल्याण संस्थांना अनुदाने | २२३५D३६४ ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ९५६४ | १९१० |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापुर्वी वित्त विभागाच्या दि. १२.०४.२०२३ च्या परिपत्रकामध्ये नमूद परिच्छेद ४ ते १८ मधील मार्गदर्शक सूचना व परिशिष्टातील मार्गदर्शक सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

२) महामंडळाला योजना/योजनेतर आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधित अनिवार्य योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच खर्च करावा.

३) व्यवस्थापनावरील खर्च मर्यादित ठेवण्याच्या दृष्टीने कामकाजात सुसूत्रता आणावी.

४) विविध बाबींवर खर्च केलेल्या रकमांची तपशीलवार माहिती, त्यावर केलेला खर्च याचबरोबर मागील वर्षातील अखर्चित निधी याबाबतची माहिती शासनास तात्काळ सादर करावी.

५) महामंडळाने वितरीत केलेल्या कर्जाच्या वसुलीचे प्रमाण प्रभावीपणे राबविण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न करावेत.

६) केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये. कार्यालयीन खर्चात काटकसर करावी.

४. या व्यवस्थापकीय अनुदानाबाबत उप सचिव (महामंडळे), दिव्यांग कल्याण-३, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदर अनुदानाची रक्कम पुढील कार्यवाहीकरीता प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, नवी मुंबई यांचेकडे सुपुर्द करण्यात येत आहे. **वित्त विभाग, शा.नि.क्र. मुंविनि-२०२२/ प्र.क्र.२४/२०२२/विनियम, दि. १२.०१.२०२३ नुसार सदरचे अनुदान हे बिनशर्त आहे.** त्यांना सदर अनुदान म.को.नि.४४(अ) मधील नमुन्यातील देयकान्वये महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ यांस संवितरीत करण्याचे अधिकार देण्यात येत आहेत.

५. या बाबींवरील खर्च "मागणी क्रमांक झेडआय-३, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, १०१ अपंगाचे कल्याण, (०८) दिव्यांग कल्याण संस्थांना अनुदाने, (०८) (०१) महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळास व्यवस्थापकीय अनुदान (अनिवार्य) (२२३५D३६४) ३६, सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१६१६४९४०९२३५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ADHIKRAO BAPU BUDHE

Digitally signed by ADHIKRAO BAPU BUDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6DD8309934E3A186F9E32AB2ED268A322FA2805ECBD838D076066AA8F4668BC0, cn=ADHIKRAO BAPU BUDHE
Date: 2023.06.16 16:51:11 +05'30'

**( अधिकराव बुधे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, दिव्यांग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य दिव्यांग वित्त व विकास महामंडळ मर्या.,मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
४) उप सचिव/अवर सचिव (दिव्यांग कल्याण-३), दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग, नवी मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/ठाणे.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) अप्पर कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
१०) कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प/साउ), मंत्रालय, मुंबई.
११) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई.
१२) अवर सचिव/कक्ष अधिकारी, कार्यासन-दि.क.२, दिव्यांग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती/दिव्यांग कल्याण-३.